**प्रधानमंत्री पीक विमा योजना - खरीप हंगाम २०१७ मध्ये राबविण्यास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. प्रपीवियो - २०१७/प्र.क्र. १/११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०४ ऑगस्ट, २०१७

वाचा :-

१.केंद्र शासनाची प्रशासकीय मान्यता, १३०१५/०३/२०१६/क्रेडिट २, दिनांक २३.०२.२०१७ व मार्गदर्शक सुचना.
२. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपीवियो-२०१७/प्र.क्र. १/११-अे, दिनांक.२०.६.२०१७
३. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.प्रपीवियो पुरक-२०१७/प्र.क्र.१/११-अे,दिनांक २३.६.२०१७
४. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपीवियो -२०१७/प्र.क्र. १/११-अे, दिनांक.०१.०८.२०१७
५. कृषि मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १३०१२/०४/२०१७- CR II (FTS No ५११२३) दि.०१.०८.२०१७
६. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपीवियो -२०१७/प्र.क्र. १/११-अे, दिनांक ०१.०८.२०१७

**शासन निर्णय पुरकपत्र :**

खरीप हंगाम २०१७ मध्ये राज्यात प्रधानमंत्री पिक विमा योजना संदर्भ क्र २ व ३ अनुसार अधिसूचित क्षेत्रातील अधिसूचित पिकांसाठी राबविण्यात येत आहे. त्यानुसार या योजनेअंतर्गत खरीप हंगाम २०१७ करिता शेतकरी सहभागाची अंतिम मुदत दि.३१ जुलै, २०१७ अशी आहे. तथापि, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार अर्ज भरण्यामध्ये येणाऱ्या तांत्रिक अडचणी लक्षात घेता सदर योजनेमध्ये शेतकऱ्यांनी सहभागी होण्याची मुदत वाढविण्याबाबत शासनाकडे प्राप्त झालेल्या विनंत्यांच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या मान्यतेने योजनेमध्ये शेतकऱ्यांच्या सहभागाची मुदत दि.०४.०८.२०१७ पर्यंत वाढविण्याबाबतचा शासन निर्णय दि.०१.०८.२०१७ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. मात्र, या मुदतीतही तांत्रिक कारणास्तव शेतकऱ्यांना अर्ज भरता आले नाही असा अहवाल प्राप्त झाला आहे. या परिस्थितीत बिगर कर्जदार शेतकऱ्यांसाठी सहभागाची मुदत दि.०५.०८.२०१७ रोजी सायंकाळी ०५.०० वाजेपर्यंत खालील अटी व शर्तीवर केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून वाढविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) प्रस्तुत मुदतवाढ केवळ बिगर कर्जदार शेतकऱ्यांसाठीच देण्यात आली आहे.
२) प्रस्तुत मुदतवाढीच्या कालावधीत जनसुविधा केंद्राच्या माध्यमातून भरलेले अर्जच मान्य करण्यात येतील.
३) प्रस्तूत मुदतवाढ केंद्रशासनाच्या मान्यतेच्या अधीन असल्यामुळे मुदतवाढीच्या कालावधीत दाखल करण्यात आलेल्या अर्जाबाबत विमा हप्ता रक्कम नंतर जमा करून घेण्यात येणार असल्याने दाखल करण्यात येणाऱ्या अर्जासोबत शेतकऱ्यांनी कोणतीही विमा हप्ता रक्कम भरणा करावयाची नाही.
४) शेतकऱ्यांच्या अर्जाची दोन आठवड्यांच्या कालावधीत छाननी करण्यात येईल आणि शेतकऱ्यांनी विमा हप्ता रकमेचा भरणा अर्जाची छाननी करण्याच्या वेळी करावयाचा आहे.
५) शेतकऱ्यांच्या अर्जाची छाननी झाल्यानंतर आणि शेतकऱ्यांनी विमा हप्ता रकमेचा भरणा केल्यानंतरच संबंधित शेतकरी नुकसान भरपाई मिळण्यास पात्र ठरतील.

६) अर्जदार शेतकऱ्यांकडील पीक पेरणी प्रमाणपत्र दि. ३१.०७.२०१७ अथवा त्यापूर्वीचे असणे आवश्यक आहे.

७) प्रस्तूत मुदतवाढीच्या कालावधीत दाखल करण्यात आलेल्या अर्जांबाबत जनसुविधा केंद्राव्दारे शेतकऱ्यांना पोच पावती देवून अर्जांची स्वतंत्रपणे यादी ठेवण्यात यावी आणि सदर यादीसह अर्ज मोहोरबंद करून दि.०७.०८.२०१७ पर्यंत कार्यालयीन वेळेत जिल्हाधिकारी कार्यालयात सुपुर्त करण्यात यावेत. अर्ज जिल्हाधिकारी कार्यालयात यादीसह जमा करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित जनसुविधा केंद्राची असेल.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०५१११९५५४४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Balkrishna Pawaskar

Digitally signed by Sharad Balkrishna Pawaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f4ebb91d526d59e93b9365fba816854d2dfa38e53ed59ae4b31ba8260ba52882, cn=Sharad Balkrishna Pawaskar
Date: 2017.08.05 11:07:02 +05'30'

**( श.बा.पावसकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव.
४. सचिव, कृषि मंत्रालय, कृषि, शेतकरी कल्याण व सहकार विभाग, कृषि भवन, नवी दिल्ली.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई - ३२.
६. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. प्रधान सचिव (महसूल) महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अपर मुख्य सचिव (सहकार), सहकार व पणन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१ (५ प्रती).
१२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१.
१३. अध्यक्ष व कार्यकारी संचालक, भारतीय कृषि विमा कंपनी, १३ वा मजला, अंबादिप बिल्डिंग, कस्तुरबा गांधी मार्ग, कॅनॉट प्लेस, नवी दिल्ली.
१४. विभागीय आयुक्त (सर्व)
१५. जिल्हाधिकारी (सर्व)
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१७. कृषि संचालक, (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, म.रा., पुणे
१८. महानिदेशक, माहीती व प्रसिध्दी विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ (प्रसिध्दीकरिता)
१९. अतिरिक्त निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१

२०. विमा संचालक, म्हाडा बिल्डींग, पहीला मजला, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०० ०५१
२१. महालेखापाल, महाराष्ट्र, १/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२२. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी मर्यादित, नवीन स्टॉक एक्सचेंज बिल्डींग, २० वा मजला, दलाल स्ट्रीट, मुंबई-४०० ०२३.
२३.व्यवस्थापक, रिलायंस जनरल इन्शुरन्स कंपनी लि. वेस्टर्न एक्सप्रेस हायवे, ५ वा मजला, चिंतामणी अव्हेन्यू, विरानी औदयोगीक वसाहती जवळ, गोरेगाव (इ), मुंबई-४०००६३.
२४.व्यवस्थापक, नॅशनल इंशुरंस कं. लि., मंडल कार्यालय, ३ रा मजला, स्टलिंग सिनेमा बिल्डिंग, ६५, मर्झबान रोड, मुंबई, ४००००१
२५.व्यवस्थापक, ओरीएंटल इंशुरंस कं. लि., मेफेयर टॉवर्स, पुणे-मुंबई रोड, वाकडेवाडी - पुणे ४११००५
२६. व्यवस्थापक, दि. युनायटेड इंडिया इंशुरंस कं. लि., प्रादेशिक कार्यालय, ५ वा मजला, भारती विद्यापीठ भवन, लालबहादुर शास्त्री मार्ग, नवी पेठ पुणे ४११०३०
२७.सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्यादित, ९ नगिनदास स्ट्रीट, मुंबई-४०० ०२३
२८. मुख्य अधिकारी, सेन्ट्रल फायनान्स एजंसी, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्यादित, ९ नगिनदास स्ट्रीट, मुंबई-२३
२९. सहायक महाप्रबंधक, रुरल प्लॅनींग अँड क्रेडिट डीपार्टमेंट, रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, न्यू सेन्ट्रल ऑफीस, फोर्ट, मुंबई- ४०० ००१
३०. व्यवस्थापक, रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, रिजनल ऑफीस, डॉ. ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई-४०० ०१८
३१. सरव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर्स, शिवसागर इस्टेट, डॉ. ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई-४०० ०१८
३२. उप सरव्यवस्थापक, नाबार्ड, ५४ वेलस्ली रोड, शिवाजी नगर, पुणे-४११ ००५.
३३. उप सरव्यवस्थापक, एस.एल.बी.सी., बँक ऑफ महाराष्ट्र, १५०१, शिवाजीनगर, पुणे-४११ ००५.
३४. व्यवस्थापक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, (सर्व).
३५. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व).
३६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१ (५ प्रती).
३७. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व).
३८. विभागीय सांख्यिक, व्दारा - विभागीय कृषि सहसंचालक कार्यालय (सर्व).
३९. सहसचिव (११-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४०. क्रेडिट स्पेशालिस्ट, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४१. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
४२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
४३. अधिदान व लेखाधिकारी, लेखा व कोषागारे संचालनालय, मंबई ३२.
४४. सर्व विधानसभा सदस्य.
४५. सर्व विधान परिषद सदस्य.
४६.निवड नस्ती, कार्यासन ११-अे.